**शासकीय आदिवासी मुलांचे/ मुलींचे वसतिगृह, चांदवड, ता. चांदवड, जि. नाशिक येथील वसतीगृहाच्या अतिरिक्त कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : आवबां -२०१०/प्र.क्र. १९०/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :** 2८ **ऑक्टोबर, २०१०**

**वाचा:** १) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक यांचे पत्रक्र.प्रशा-२/६५९८/२०१०, दिनांक ४/९/२०१०
२) शासन निर्णय क्र. आवबा-२०१०/प्र.क्र.३५/का.१२, दिनांक १७ मार्च,२०१०.

**शासन निर्णय** : अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक जिल्हयातील चांदवड येथे सन २००९-१० च्या दरसूचीने तयार केलेल्या प्रत्येकी ७५ क्षमतेच्या मुलां/मुलींच्या शासकीय आदिवासी वसतीगृह बांधकामाच्या अतिरिक्त बाबींचे अंदाजपत्रकातील संभाव्य १० टक्के दरवाढ व आकस्मिकता निधी ४ टक्के वगळून प्रत्येकी रु. ५३,३८,२५८/- (रु. त्र्येपन्न लक्ष.अडतीस हजार दोनशे अठ्ठावन्न फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयाव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

अंदाजपत्रकातील कामांचा वाव खालीलप्रमाणे आहे.
१. जमिन सपाटीकरण.
२. अंतर्गत रस्ते.
३. अंपगासाठी रॅम्सचे बांधकाम.
४. पावसाळी पाणी साठवणूक.
५. संरक्षक भिंत व कंपाऊंड भिंत.
६. विद्युतीकरण.
७. बाहय पाणीपुरवठा योजना.
८. अग्नीशमण व्यवस्था.
९. सोलर सिस्टम व पथदिवे.
१०. वनीकरण.

**३.** उपरोक्त प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधिन राहून देण्यात येत आहे :-

**अ)** काम सुरु करण्यापूर्वी जमिनीच्या मालकी हक्काबाबतची खातरजमा करण्यात यावी.

**ब)** मांडणी नकाशा व विस्तृत नकाशा मुख्यवास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मंजूर करून घेऊनच काम सुरु करावे.

क) सदर अंदाजपत्रक सन २००९-१० च्या दरसूचीवर आधारित असल्याने अंदाजपत्रकात दर्शविण्यात आलेली संभाव्य भाववाढ वगळण्यात येत आहे.

ड) दि.१७ मार्च, २०१० च्या शासन निर्णयातील वाव (Scope) मध्ये पुर्नरावृत्ती होत असल्यास या अंदाजपत्रकातून सदर बाब वगळण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने आणि शासन निर्णय,वित्त विभाग क्रमांक-विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक 201010282103 1 असा आहे. 6001

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कैलास द. भंडलेकर )
उप सचिव

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण, जि.नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग (पूर्व ), नाशिक.
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, चांदवड, ता. चांदवड, जि. नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थ-१९) , मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६),मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती (का.१२)